**अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना अर्थसहाय्य या योजनेंतर्गत वाढीव अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.**
**पद्मावती मागासवर्गीय औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या., इसाद, ता. गंगाखेड, जि. परभणी.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मासाका-२०२२/प्र.क्र.१२८/ अजाक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
**दिनांक : १६ जुलै, २०२४.**

वाचा

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्र. मासाका -२००८/ प्र.क्र.१५०/ विघयो-२, दिनांक २२ मे, २००८
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. मासाका-२०२२/ प्र.क्र.१२८/ अजाक, दिनांक २४ जून, २०२२.
३) आयुक्त, समाजकल्याण आयुक्ताबलय यांचे पत्र क्र. सकसं/ अजाउजो-१/ निधी वाढवून मिळणे/ का-१४/२०२३-२४/५०५, दिनांक २७ जून, २०२३.

प्रस्तावना

पद्मावती मागासवर्गीय औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या., इसाद, ता. गंगाखेड, जि. परभणी या संस्थेचा स्टॉन क्रेशर उत्पादन प्रकल्प उभारणीबाबतचा एकूण रु.७०० लक्ष इतक्या किंमतीचा प्रकल्पास संदर्भ क्र.०२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच सदर संस्थेस शासकीय भागभांडवलापोटी रुपये ५०.०० लक्ष (रुपये पंन्नास लक्ष फक्त) व दिर्घ मुदतीचे कर्जापोटी रुपये ५०.०० लक्ष (रुपये पंन्नास लक्ष फक्त) असे एकूण रुपये १००.०० लक्ष (रुपये शंभर लक्ष फक्त) एवढे अर्थसहाय्य मंजूर करण्यात आला आहे. तथापि सदरचा निधी अपूरा असल्या मुळे निधी वाढवून देण्याची विनंती उपरोक्त संस्थेने शासनास केली होती. त्यास अनुसरुन सदर संस्थेस वाढीव अर्थसहाय्य मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त परिस्थिती विचारात घेता, पद्मावती मागासवर्गीय औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या., इसाद, ता. गंगाखेड, जि. परभणी या संस्थेचे प्रकल्प मुल्य विचारात घेता, सदर संस्थेला यापूर्वी मंजूर केलेल्या निधी मध्ये संस्थेच्या बांधकामाचा किंवा मशिनरीचा खर्च भागविणे अशक्य आहे. त्यामुळे सदर संस्थेस शासकीय भागभांडवलापोटी रु. १००.०० लक्ष व शासकीय दिर्घ मुदतीच्या कर्जापोटी रु. १००.०० लक्ष एवढा असा एकूण रु. २००.०० लक्ष निधी वाढवुन देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

यावर होणार खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालू आर्थिक वर्षाकरीत मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा:

**भागभांडवल रुपये १००.०० लक्ष (रुपये शंभर लक्ष फक्त)**
**मागणी क्रमांक एन-४**
४२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च
०१, अनुसूचित जातीचे कल्याण
१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना)
(०१)(०४) अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना भाग भांडवली अंशदान (४२२५ ०४५ २)
**३२, अंशदाने**

**दिर्घ मुदतीचे कर्ज रुपये १००.०० लक्ष (रुपये शंभर लक्ष फक्त)**
**मागणी क्रमांक एन-४**
६२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांच्या कल्याणासाठी कर्ज
०१, अनुसूचित जातीचे कल्याण
८००, इतर कर्जे, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (विघयो)
(०१)(०४) अनुसूचित जातीच्या सहकारी संस्थांना कर्जे (६२२५ ०२५ १)
५५, कर्जे व आगाऊ रकमा

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/ प्र.क्र. ३४/ अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागास उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या मर्यादेत व प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१६१८३९४३८०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b11f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2024.07.16 18:51:12 +05'30'

**( प्रविण शिशुपाल )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. संचालक, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
४. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी,
५. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, छत्रपती संभाजीनगर,
६. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, परभणी,
७. जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, परभणी,
८. चेअरमन, पद्मावती मागासवर्गीय औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या., इसाद, ता. गंगाखेड, जि. परभणी,
९. कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प कार्यासन, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१०. निवडनस्ती (अजाक).